फलटण तालुका सहकारी दूध उत्पादक संघ मर्या.
फलटण या संघावर शासन नियुक्त अशासकीय
सदस्याची नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एमएलके- २०१९/प्र.क्र.१० /पदुम-१०**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक: १८ फेब्रुवारी, २०१९**

वाचा:- १) सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभागाची क्र. सीएसएल-२०१६/प्र.क्र.१९/१३-स, दिनांक-६/४/२०१६ व दि.१४/३/२०१७ ची अधिसूचना.
२) सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभागाचा महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० सन २०१८ चे अधिनियम क्र. १६५/२०१८, दिनांक-१४/१२/२०१८

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम ७३ अ अ अ चे पोटकलम (२) मधील तरतुदींच्या अनुषंगाने सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभागाच्या दि.६/४/२०१६ व दि.१४/३/२०१७ रोजीच्या अधिसूचनांव्ये शासनाचे भागभांडवल असलेल्या सहकारी संस्थांवर नेमावयाच्या शासन प्रतिनिधींची अर्हता व अनुभव निश्चित करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे कलम ७३ अ अ अ चे पोटकलम (२) चे परंतूकात दि.१४/१२/२०१८ रोजी सुधारणा करण्यात आली. सदर सुधारणेनुसार "ज्या सहकारी संस्थांना भागभांडवल, कर्ज, हमी, अनुदान, शासकीय जमीन या स्वरुपात किंवा इतर कोणत्याही स्वरुपात - मग ते रोख किंवा वस्तू रुपाने असो, शासनाचे सहाय्य असलेल्या गृह निर्माण संस्था वगळून इतर संस्थेच्या बाबतीत" संचालक मंडळामध्ये एक शासकीय अधिकारी जो सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था यापेक्षा कमी दर्जाचा नसेल अशा व्यक्तीस संचालक म्हणून नियुक्त करता येईल आणि एक खाजगी व्यक्ती जिला, ज्या प्रकारची सहकारी संस्था आहे, अशा सहकारी संस्थांशी संबंधित कार्यपध्दतीविषयी अनुभव असेल , तिला शासन नियुक्त संचालक म्हणून नेमता येईल, अशी तरतूद केली आहे.

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील तरतूदीनुसार श्री. शेखर गणपत खरात , मु.पो.पाडेगांव ता.फलटण जि.सातारा हे शैक्षणिक अर्हता व अनुभव ह्या पात्रता पूर्ण करीत असल्याने, त्यांची फलटण तालुका सहकारी दूध उत्पादक संघ मर्या. फलटण या संघावर शासन नियुक्त अशासकीय सदस्य म्हणून नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

फलटण तालुका सहकारी दूध उत्पादक संघ मर्या. फलटण जि.सातारा या संघाच्या संचालक मंडळामध्ये शासन नियुक्त अशासकीय सदस्य म्हणून श्री. शेखर गणपत खरात , मु.पो.पाडेगांव ता.फलटण जि.सातारा यांची नेमणूक करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०२१८१४५३४८७३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB K
RASKAR

Digitally signed by BALASAHEB K RASKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454ac5c700ad6e2a7ad0b311
5db, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=2cf78d68ceeac33ca63c8a2f2b360ebf1c6ac77c6a1ad4c5bfb24951806
af0a8, ou=AGRICULTURE DIARY AND FISHERTES DEPT, o=GOVERNMENT OF
MAHARASHTRA, cn=BALASAHEB K RASKAR
Date: 2019.02.18 14:55:38 +05'30'

**(बा.कि.रासकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

२. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई-१८
६. सहनिबंधक,सहकारी संस्था (दुग्ध), वरळी, मुंबई -१८
७. विभागीय उपनिबंधक, सहकारी संस्था (दुग्ध), पुणे विभाग, पुणे.
८. सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था (दुग्ध), सातारा.
९. व्यवस्थापकीय संचालक, फलटण तालुका सहकारी दूध उत्पादक संघ मर्या. फलटण
१० श्री. शेखर गणपत खरात , मु.पो.पाडेगांव ता.फलटण जि.सातारा
११. निवडनस्ती (कार्यासन -पदुम-१०)